**अतिदूरच्या स्थानकांवरून बृहन्मुंबईतील शासकीय कार्यालयांत येणाऱ्या अधिकारी / कर्मचाऱ्यांना वेळेत सवलत देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : समय-२०१८ / प्र. क्र. १०२ / १८(र.वका.)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय (विस्तार), मुंबई ४०००३२,
दिनांक : २८ डिसेंबर, २०२१.

वाचा:-

१. शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : समय-१०९३ / प्र. क्र. ३८ / ९३ / १८ (र.वका.), दिनांक १५ ऑक्टोबर, १९९३.
२. शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : समय-१०९६ / प्र. क्र. २२४ / ९६ / १८ (र.वका.), दिनांक २९ ऑगस्ट, १९९६.
३. शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : समय-१०९९ / प्र. क्र. १६ / ९९ / १८ (र.वका.), दिनांक ३० मार्च, १९९९.
४. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : समय-२०१६ / प्र. क्र. ६२ / १८ (र.वका.), दिनांक २४ फेब्रुवारी, २०२०.

**प्रस्तावना :-**

उपरोक्त दिनांक १५ ऑक्टोबर, १९९३ च्या परिपत्रकान्वये, मध्य रेल्वेच्या “कर्जत” स्थानकापासून “पुणे” स्थानकापर्यंतच्या स्थानकांवरून दररोज तसेच दिनांक २९ ऑगस्ट, १९९६ व दिनांक ३० मार्च, १९९९ च्या परिपत्रकान्वये “नाशिक” येथून सार्वजनिक / साप्ताहिक सुटीच्या दुसऱ्या दिवशी बृहन्मुंबईतील शासकीय कार्यालयांत येणाऱ्या अधिकारी / कर्मचारी यांना नैमित्तिक / अर्जित रजा शासनास समर्पित करण्याच्या अटीवर सकाळी वेळेमध्ये सवलत प्रदान करण्यात आलेली आहे.

२. “नाशिक” येथून दररोज बृहन्मुंबईत येण्यासाठी उपलब्ध असलेली रेल्वे सुविधा तसेच पुणे / नाशिक येथून येणाऱ्या अधिकारी / कर्मचाऱ्यांना देण्यात येत असलेला सवलतीचा कालावधी व त्याबदल्यात समर्पित करावयाच्या रजा यांचा सांगोपांग विचार करून याबाबत सदर सवलतींचे पुनर्विलोकन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याचप्रमाणे दिनांक २४ फेब्रुवारी, २०२० च्या शासन निर्णयान्वये कार्यालयीन वेळ सायंकाळी ६.१५ वा. पर्यंत वाढविण्यात आल्याने त्यानंतर पश्चिम रेल्वेच्या विरार स्थानकापलीकडील डहाणूपर्यंतच्या स्थानकांवरून येणाऱ्या अधिकारी / कर्मचाऱ्यांना उपलब्ध असलेल्या रेल्वे सुविधांचा विचार करून यासंदर्भात खालीलप्रमाणे सूचना निर्गमित करण्यात येत आहेत:-

**शासन परिपत्रक :-**

मध्य रेल्वेच्या "कर्जत" स्थानकापलीकडील "पुणे" स्थानकापर्यंतच्या स्थानकांवरून तसेच "कसारा" स्थानकापलीकडील "नाशिक" पर्यंतच्या स्थानकांवरून बृहन्मुंबईतील शासकीय कार्यालयांत येणाऱ्या अधिकारी / कर्मचाऱ्यांना सकाळी ५० मिनिटे म्हणजेच सकाळी १०.३५ वा. पर्यंत उशिरा येण्याची तसेच पश्चिम रेल्वेच्या विरार स्थानकापलीकडील डहाणू स्थानकापर्यंतच्या स्थानकांहून बृहन्मुंबईतील कार्यालयांत दररोज येणाऱ्या अधिकारी / कर्मचाऱ्यांना सायंकाळी कार्यालयीन वेळेमध्ये ५० मिनिटांची म्हणजेच सायंकाळी ५.२५ वाजता कार्यालय सोडण्याची विशेष सवलत खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे:-

अ) उशिरा येण्याच्या / सायंकाळी लवकर कार्यालय सोडण्याच्या बदल्यात संबंधित अधिकारी / कर्मचाऱ्यांनी दरवर्षी १५ दिवसांची अर्जित रजा शासनास समर्पित कराव्यात व तसे वर्षाच्या सुरुवातीला लेखी द्यावे.

आ) उक्त सवलत प्राप्त होणाऱ्या कर्जत-पुणे तसेच कसारा-नाशिक येथून प्रवास करणा-या अधिकारी / कर्मचाऱ्यांना संध्याकाळी कार्यालय लवकर सोडण्याची परवानगी अनुज्ञेय असणार नाही.

इ) उक्त सवलत मंजूर करण्यापूर्वी संबंधित अधिकारी / कर्मचारी यांच्या, कार्यालयात उशिरा येण्यामुळे / कार्यालय लवकर सोडण्यामुळे कार्यालयीन कामकाजावर विपरीत परिणाम होत नसल्याची खातरजमा करण्याची जबाबदारी संबंधित विभाग / कार्यालयाच्या आस्थापना शाखेची राहील.

ई) ज्या अधिकारी / कर्मचाऱ्यांनी शासकीय निवासस्थानासाठी अर्ज केले असून निवासस्थान उपलब्ध होऊ शकले नाही, अशाच अधिकारी / कर्मचाऱ्यांना उक्त सवलत लागू राहील.

उ) प्रत्येक अधिकारी / कर्मचाऱ्याच्या बाबतीत सवलत देण्याचा निर्णय घेण्याचे अधिकार हे कार्यालय प्रमुखांना असतील व ही सवलत, हक्क म्हणून मानण्यात येणार नाही.

२. "नाशिक" येथून बृहन्मुंबईतील कार्यालयांत येणारे अधिकारी / कर्मचारी यांच्यापैकी दररोजची सवलत घेऊ इच्छित नसलेल्या तथापि सार्वजनिक / साप्ताहिक सुटीच्या दुसऱ्या दिवशी कार्यालयात २ तास उशिरा येण्याची सवलत घेऊ इच्छिणाऱ्या अधिकारी / कर्मचारी यांना दिनांक २९ ऑगस्ट, १९९६ च्या परिपत्रकान्वये (सदर परिपत्रकातील अटींच्या अधीन राहून) देण्यात आलेली सवलत कायम ठेवण्यात आली आहे. तथापि त्याबदल्यात त्यांनी दरवर्षी ८ अर्जित रजा शासनास समर्पित करणे आवश्यक राहील.

३. सदर शासन परिपत्रक हे महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०२११२२८१५३२३२०००७ असा आहे. हे आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Indra Mallo

Digitally signed by Indra Mallo
DN: c=IN, o=Personal, 2.5.4.20=92b852624baa852a6d07acef786c78e703b2b218958e8c193232b28a89b9cf9a, postalCode=400021, st=Maharashtra, serialNumber=ecae14ed1e3640fe493f5246d6381f68a38e03589870d467c9bac54f641fcf32, cn=Indra Mallo
Date: 2021.12.28 15:33:54 +05'30'

**(इंद्रा मालो)**
**सचिव (प्र.सु.,र.व का.)**

**प्रत :**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव.
२. मा.सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
३. मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
४. मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
५. मा.उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
६. मा.उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
७. सर्व सन्माननीय विधानसभा, विधानपरिषद व संसद सदस्य.
८. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई - ४०००३२.
९. मा.उपमुख्यमंत्र्यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई - ४०००३२.
१०. सर्व मा.मंत्री / मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई - ४०००३२.
११. मा.मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई - ४०००३२.
१२. मा.महाअधिवक्ता, महाराष्ट्र राज्य.
१३. सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई - ४०००३२.
१४. प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई.
१५. प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई.
१६. प्रबंधक, लोकआयुक्त व उपलोकआयुक्त यांचे कार्यालय, मुंबई.
१७. सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई.
१८. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.
१९. प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई.
२०. मुख्य माहिती आयुक्त, राज्य माहिती आयोग, मुंबई.
२१. राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त, राज्य सेवा हक्क आयोग, मुंबई.
२२. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई.
२३. भारतीय जनता पक्ष, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ.बॅरॅक नं.१, योगक्षेमसमोर, वसंतराव भागवत चौक, नरिमन पॉईंट, मुंबई - ४०० ०२०.
२४. इंडियन नॅशनल कॉंग्रेस, महाराष्ट्र प्रदेश कॉंग्रेस (इं) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई-४०० ०२५.

२५. राष्ट्रवादी कॉंग्रेस पक्ष, ठाकरसी हाऊस, जे.एन.हेरेडिया मार्ग, बॅलार्ड इस्टेट, मुंबई - ४०० ०३८.

२६. शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई-४०००२८.

२७. बहुजन समाज पार्टी, प्रदेश सचिव, महाराष्ट्र राज्य, बी.एस.जी.भवन, भूखंड क्र. ८३-अे, कलेक्टर कॉलनी, चेंबूर, मुंबई-४०० ०७४.

२८. भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र समिती, ३१४, राजभवन, एस.व्ही.पटेल मार्ग, मुंबई ४००००४.

२९. भारतीय कम्युनिस्ट (मार्क्सवादी) पार्टी, महाराष्ट्र समिती, जनशक्ती सभागृह, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई - ४०० ०१३.

३०. महाराष्ट्र नवनिर्माण सेना, राजगड, मातोश्री टॉवर, शिवाजी पार्क, दादर, मुंबई ४०००२८.

३१. निवड नस्ती (कार्यासन - १८), सामान्य प्रशासन विभाग.